महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील पदव्युत्तर पदवी अर्हताधारक वैद्यकीय अधिकाऱ्यांना जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गात तदर्थ पदोन्नती देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पदोन्न-१११४/प्र.क्र.१५२/सेवा-२**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार संकुल इमारत १० वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ५ जानेवारी, २०१९

**वाचा : -**

१) सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्रमांक-बीसीसी-२०१७/प्र.क्र. ३१२ अे/१६-ब, दि. २९.१२.२०१७
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन आदेश क्र. पदोन्न-१११४/प्र.क्र.१५२/सेवा-२, दि. ०९.०५.२०१८
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन आदेश क्र. पदोन्न-१११४/प्र.क्र.१५२/सेवा-२, दि. १०.१०.२०१८

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील (वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु. ५४०० ) खालील पदव्युत्तर पदवीधारक वैद्यकीय अधिकाऱ्यांना “जिल्हा शल्य चिकित्सक” (वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु. ६६००) या संवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. प्रस्तुत पदोन्नतीनंतर संबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांची पदस्थापना खालील विवरणपत्रामधील “स्तंभ-४” मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्याचे नाव व सध्याची पदस्थापना | प्रवर्ग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | डॉ. बालाजी संतराम मुंढे, वैद्यकीय अधिकारी, जिल्हा रुग्णालय, जालना | खुला | वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय मौदा, जि. नागपूर |

३. सदर पदोन्नत्या “जिल्हा शल्य चिकित्सक” या संवर्गातील पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार देण्यात येत आहेत.

४. सदर तदर्थ पदोन्नती मा. सवौच्च न्यायालयात प्रलंबित विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे.

५. सदर तदर्थ पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यततेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

६. जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गात दिलेल्या सदर तदर्थ पदोन्नत्या हया तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्याकरिता असून सदर पदावर संबंधित अधिकाऱ्याचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही. तसेच सदर पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यास नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

७. पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी पदोन्नतीनंतर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतन निश्चितीचा विकल्प द्यावा, असा विकल्प न दिल्यास त्यांची वेतन निश्चिती, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११(१)(ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

८. संबंधित अधिकाऱ्यांना त्यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेवर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी एक महिन्याच्या आत हजर होऊन, त्याबाबतचा अहवाल उपसंचालक, आरोग्य सेवा, संचालक, आरोग्य सेवा, मुंबई याना व शासनास सादर करावा. पदस्थापना बदलून घेण्यासाठी राजकीय दबाव आणल्यास सदर कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील तरतूदीनुसार शिस्तभंग विषयक कारवाईस पात्र ठरेल.

९. पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेवर विहित मुदतीत हजर व्हावे. जे अधिकारी विहित मुदतीत पदोन्तीवर हजर होणार नाहीत ते पदोन्नतीस इच्छुक नाहीत असे गृहीत धरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच त्यांना देण्यात आलेला आश्वासीत प्रगती योजनेचा लाभ काढून घेण्यात येईल. या प्रकरणी संबंधित उपसंचालक यानी संबंधित अधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी वेळीच हजर होतात किंवा नाही याबाबतचा अनुपालन अहवाल विहित कालमर्यादेत शासनास सादर करावा.

१०. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०४१३४४१०२९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, serialNumber=9ab69d6945f8950a9525831f8ae9726be295d17576e78d19fa8f6cb952bb04a0, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2019.01.05 12:15:06 +05'30'

(वि. पुं. घोडके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, महाराष्ट्र लोक सेवा आयोग, मुंबई (पत्राने)
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
४. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
५. सह संचालक, आरोग्य सेवा (अ. व प्र.) मुंबई
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद / नागपूर
७. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, जालना / नागपूर
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर

१०. जिल्हा कोषागार अधिकारी जालना / नागपूर
११. मा. मंत्री (आरोग्य)/मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१२ व १६-ब, मंत्रालय, मुंबई
१३. प्रधान सचिव (सा.आ.) यांचे स्विय सहायक
१४. संबधित अधिकारी यांना (संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे मार्फत)
१५. निवडनस्ती सेवा-२